# प्रार्थना

**ॐ सहना ववतु सहनौ भुनक्तु सहविर्यम् करवावहे**

**तेजस्विना वधीतम्अस्तु मा विद विशावहै**

**|| ॐ शांतिः शांतिः शांति : ||**

**Om Sahana Vavatu  Sahanau Bhunaktu**
**Sahaveeryam Karavavahai**
**Tejas Vinavadhtamastu Maa Vidhvishavahai**
**Om ShantiH ShantiH Shantihi**

May the Lord protect both of us (speaker and the listener). May he ensure that we are both nourished and happy. May we two exert together (for the acquisition of the knowledge). May the knowledge that we study illuminate our minds. May we not bear ill-will towards each other.

Om, Peace, Peace, Peace.

# दशक १९ समास नववा : राजकारणनिरूपण

## प्रस्तावना

- मागच्या वेळी आपण नामस्मरण भक्ती पहिली. त्यामध्ये रामदासांच्या आध्यात्मिक ओढीचे प्रतिबिंब पडलेले दिसते.

- आज आपण घेणार आहोत दशक १९(शिकवण) समास ०९ - राजकारण निरुपण

- ज्यांना लोकसंग्रह करायचा आहे किंवा Management/Marketing करायचे असेल अथवा करत असतील तर त्यांच्या करिता हा दशक (१९) guideline आहे.

- हा दशक १९ आहे. त्यानंतर फक्त एकच दशक आहे. समर्थांनी राजकारण कधी व कसे करावे हे अगदी ग्रंथाच्या शेवटी सांगितले आहे. पण तुम्हा मंडळींची वैचारिक पातळी खूप वरची असल्यामुळे आम्ही हा समास निवडलेला आहे.

# दशक १९ समास नववा : राजकारणनिरूपण

## प्रस्तावना

- जरी रामदास स्वामी मुख्यतः लोकांना अध्यात्माची शिकवण देत असले तरी त्यांना राजकारणाची उत्तम समज होती. त्याची थोडी झलक म्हणून हा समास घेतला आहे. आर्य चाणक्याने सम्राट चंद्रगुप्ताला चाणक्य नीती सांगितली, त्यात तो म्हणतो "राजाचे मुख गंभीर दिसण्यासाठी उगाळलेल्या चंदनाचा मुखावर लेप असावा. सत्य हा एक अलंकार आहे, हे समजून राजाने उठसूट खरे बोलण्याचा आग्रह धरू नये (अलंकार रोज रोज कोणी वापरतो का?). ज्या गावात व्यक्ती राहते व मोठी होते तिला अधिकारी म्हणून दूरच्या प्रदेशावर नेमावे" वगैरे.

- काहीसा असाच भास रामदासांचे हे निरुपण वाचल्यावर होतो. जरी आपले उद्दिष्ट चांगले असले तरी ते साध्य होण्यासाठी वेळप्रसंगी वाकड्या मार्गांचा उपयोग करावा लागतो, हे त्यांनी पुढे सांगितले आहे. शिवाजी महाराज तरी दुसरे काय करत होते! आपला आजही जो काही धर्म म्हणून टिकून आहे तो या गुरु शिष्यांच्या आपल्यावरील उपकारामुळेच यात शंका नाही.

# दशक १९ समास नववा : राजकारणनिरूपण

- रामदास स्वामींनी शिवाजी महाराजांना प्रत्यक्ष भेटीत उपदेश केलाच असणार. लेखी पुरावा बघून म्हणावे, तर त्यांना लिहिलेले एक पत्र. त्यामध्ये राजांची स्तुती केली आहे. भेटी आधीच ते राजांवर अतिशय खुश होते. "या भूमंडळाच्या ठायी धर्म रक्षी ऐसा नाही - महाराष्ट्र धर्म राहिला काही तुम्हांकरीता" असे म्हटल्यानंतर पत्राच्या शेवटी पुढील उपदेश येतो:

"तुमचे देसी वास्तव्य केले परंतु वर्तमान नाही घेतले –
रुणानुबंधे विस्मरण झाले काये नेणो!
सर्वद्न्य मंडळी धर्ममूर्ती सांगणे काय तयांप्रती –
धर्म स्थापनेची कीर्ती सांभाळली पाहिजे!
राजकारण उदंड दाटले तेणे चित्त विभागले –
प्रसंग नसता लिहिले क्षमा केले पाहिजे!"

- थोडक्यात, हे झाले समर्थांचे प्रेमळ राजकारण! नंतर त्यांनी संभाजी राजांना पत्र लिहिले होते त्यात मात्र भरपूर उपदेश व शिवरायांची उदाहरणे देऊन केलेला आढळतो. तो भाग पुन्हा कधीतरी चर्चेसाठी घेता येईल.
- तर आता पुढे वाचूया.

# दशक १९ समास नववा : राजकारणनिरूपण

||श्रीरामसमर्थ ||

ज्ञानी आणी उदास| समुदायाचा हव्यास |
तेणें अखंड सावकाश| येकांत सेवावा ||१||

जेथें तजवीजा कळती| अखंड चाळणा निघती |
प्राणीमात्राची स्थिती गती| कळों येते ||२||

जरी हा चाळणाचि करीना| तरी कांहींच उमजेना |
हिसेबझाडाचि पाहीना| दिवाळखोर ||३||

येक मिरासी साधिती| येक सीध्या गवाविती |
व्यापकपणाची स्थिती| ऐसी आहे ||४||

हव्यास = आवड, इच्छा

तजविजा = उपाय, युक्त्या

चाळणा = मनन

हिसेबझाडा = हिशेब ठेवणे

मिरासी = जमिनीचे हक्क

सीध्या = सिद्ध झालेले, असलेले

व्यापकपणा = उद्योगीपणा

# दशक १९ समास नववा : राजकारणनिरूपण

जेणें जें जें मनीं धरिलें| तें तें आधींच समजलें |
कृत्रिम अवघेंचि खुंटलें| सहजचि येणें ||५||

कृत्रिम = कपट

अखंड राहतां सलगी होते| अतिपरिचयें अवज्ञा घडते |
याकारणें विश्रांती ते| घेतां नये ||६||

आळसें आळस केला| तरी मग कारबारचि बुडाला |
अंतरहेत चुकत गेला| समुदायाचा ||७||

अंतरहेत =
मुख्य आतले उद्दिष्ट

उदंड उपासनेचीं कामें| लावीत जावीं नित्यनेमें |
अवकाश कैंचा कृत्रिमें| करावयासी ||८||

# दशक १९ समास नववा : राजकारणनिरूपण

गोवा = गुंता

चोर भांडारी करावा| घसरतांच सांभाळावा |
गोवा मूर्खपणाचा काढावा| हळु हळु ||९||

या अवघ्या पहिल्याच गोष्टी| प्राणी कोणी नव्हता कष्टी |
राजकारणें मंडळ वेष्टी| चहुंकडे ||१०||

विकल्प = वाईट विचार

नष्टासी नष्ट योजावे| वाचळासी वाचाळ आणावे |
आपणावरी विकल्पाचे गोवे| पडोंच नेदी ||११||

कांटीनें कांटी झाडावी| झाडावी परी ते कळों नेदावी |
कळकटेपणाची पदवी| असों द्यावी ||१२||

कळकटे = भांडखोर

# दशक १९ समास नववा : राजकारणनिरूपण

न कळतां करी कार्य जें तें| तें काम तत्काळचि होतें |
गचगचेंत पडतां तें| चमत्कारें नव्हे ||१३||

ऐकोनी आवडी लागावी| देखोनी बळकटचि व्हावी |
सलगीनें आपली पदवी| सेवकामधें ||१४||

कोणीयेक काम करितां होतें| न करितां तें मागें पडतें |
या कारणें ढिलेपण तें| असोंचि नये ||१५||

जो दुसऱ्यावरी विश्वासला| त्याचा कार्यभाग बुडाला |
जो आपणचि कष्टत गेला| तोचि भला ||१६||

# दशक १९ समास नववा : राजकारणनिरूपण

अवघ्यास अवघें कळलें| तेव्हां तें रितें पडिलें |
याकारणें ऐसें घडलें| न पाहिजे कीं ||१७||

मुख्य सूत्र हातीं घ्यावें| करणें तें लोकांकरवीं करवावें |
कित्तेक खलक उगवावे| राजकारणामधें ||१८||

खलक = धूर्त

बोलके पहिलवान कळकटे| तयासीच घ्यावे झटे |
दुर्जनें राजकारण दाटे| ऐसें न करावें ||१९||

ग्रामण्य वर्मी सांपडावें| रगडून पीठचि करावें |
करूनि मागुती सांवरावें| बुडऊं नये ||२०||

ग्रामण्य = गावातील वाईट, भांडखोर माणसे

# दशक १९ समास नववा : राजकारणनिरूपण

खळदुर्जनासी भ्यालें| राजकारण नाहीं राखिलें |
तेणें अवघें प्रगट जालें| बरें वाईट ||२१||

समुदाव पाहिजे मोठा| तरी तनावा असाव्या बळकटा |
मठ करुनी ताठा| धरूं नये ||२२||

तनावा = आक्रमण शक्ती

दुर्जन प्राणी समजावे| परी ते प्रगट न करावे |
सज्जनापरीस आळवावे| महत्व देउनी ||२३||

जनामधें दुर्जन प्रगट| तरी मग अखंड खटखट |
याकारणें ते वाट| बुझूनि टाकावी ||२४||

# दशक १९ समास नववा : राजकारणनिरूपण

गनीमाच्या देखतां फौजा| रणशूरांच्या फुर्फुरिती भुजा |
ऐसा पाहिजे किं राजा| कैपक्षी परमार्थी ||२५||

तयास देखतां दुर्जन धाके| बैसवी प्रचितीचे तडाखे |
बंडपाषांडाचे वाखे| सहजचि होती ||२६||

वाखे होणे = मोडून जाणे

हे धूर्तपणाचीं कामें| राजकारण करावें नेमें |
ढिलेपणाच्या संभ्रमें| जाऊं नये ||२७||

कोठेंच पडेना दृष्टीं| ठाईं ठाईं त्याच्या गोष्टी |
वाग्विळासें सकळ सृष्टी| वेधिली तेणें ||२८||

# दशक १९ समास नववा : राजकारणनिरूपण

हुंब्यासीं हुंबा लाऊन द्यावा| टोणप्यास टोणपा आणावा |
लौंदास पुढें उभा करावा| दुसरा लौंद ||२९||

हुंबा = ठोम्ब्या

धटासी आणावा धट| उत्धटासी पाहिजे उत्धट |
खटनटासी खटनट| अगत्य करी ||३०||

जैशास तैसा जेव्हां भेटे| तेव्हां मज्यालसी थाटे |
इतुकें होतें परी धनी कोठें| दृष्टीस न पडे ||३१||

इति श्रीदासबोधे गुरुशिष्यसंवादे
राजकारणनिरूपणनाम समास नववा ||९||१९. ९
|| श्रीसीतारामचन्द्रार्पणमस्तू ||
|| जय जय रघुवीर समर्थ ||